**मुंदडाताई सेवाभावी संस्था, बीड संचलीत अस्थिव्यंग निवासी विद्यालय, साळेगांव, ता.केज, जि.बीड ही अस्थिव्यंग प्रवर्गातील शाळा मु.पो.केज (शिक्षक कॉलनी), ता.केज, जि.बीड येथे स्थलांतर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र.एमआयएस २०१७/प्र.क्र.४५४/अ.क.१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक १६ सप्टेंबर, २०१९ .

<u>वाचा -</u> १) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांचे पत्र क्रमांक अकआ/प्र-३ /अस्थि/मुंदडाताई/ स्थलांतर/बीड/२०१७-१८/५१८९, दिनांक २५.९.२०१८.
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक इडीडी २०१७/ प्र.क्र.६/अ.क.१, दि.१६.९.२०१७.

<u>प्रस्तावना</u> :-

मुंदडाताई सेवाभावी संस्था, बीड संचलीत अस्थिव्यंग निवासी विद्यालय, साळेगांव, ता.केज, जि.बीड या अस्थिव्यंग प्रवर्गातील शाळेचे नोंदणी प्रमाणपत्र क्रमांक ०१, दि.८.१०.२०१४ असे असून शाळेस २५ निवासी अनुदानीत व २५ निवासी विनाअनुदानीत अशी एकूण ५० विद्यार्थी संख्या मंजूर आहे. सदर शाळेची इमारत जूनी आणि विद्यार्थ्यांना सोयी-सुविधा पुरविण्याच्या दृष्टीने अडचण व गैरसोईचे असल्यामुळे संस्थेने मु.पो.केज (शिक्षक कॉलनी), ता.केज, जि.बीड येथे सर्व सोई-सुविधायुक्त अशी इमारत शाळेकरिता भाड्याने घेतली असल्याने शाळा स्थलांतर करण्यास परवानगी मिळण्याचा प्रस्ताव आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी शासनाकडे शिफारशीसह पाठविला होता.

संस्थेने प्रवेशित विद्यार्थ्यांना स्थलांतरीत ठिकाणी प्रवेश देण्याचे हमीपत्र सादर केले आहे. शाळा स्थलांतरणास स्थानिक जनतेचा विरोध नाही. प्रस्तावित स्थलांतर हे एकाच तालुक्यात व एकाच जिल्हयात होणार आहे. शाळेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना अपंग व्यक्ती समान संधी हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग अधिनियम, १९९५ तसेच अपंग शाळा संहिता, १९९७ मध्ये शासनाने ठरवून दिलेले निकष, नियम व निर्णयाचे अनुषंगाने अत्यावश्यक सोयी सुविधा मिळण्याच्या दृष्टीने संस्थेने सादर केलेले मागणीपत्र, कार्यकारी मंडळाचा ठराव, कर्मचारी संमतीपत्र प्रस्तावासोबत सादर केले आहे . त्यानुषंगाने मुंदडाताई सेवाभावी संस्था, बीड संचलीत अस्थिव्यंग निवासी विद्यालय, साळेगांव, ता.केज, जि.बीड ही अस्थिव्यंग प्रवर्गातील शाळा मु.पो.केज (शिक्षक कॉलनी), ता.केज, जि.बीड येथे स्थलांतर करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता .

**शासन निर्णय :-**

मुंदडाताई सेवाभावी संस्था, बीड संचलीत अस्थिव्यंग निवासी विद्यालय, साळेगांव, ता.केज, जि.बीड ही अस्थिव्यंग प्रवर्गातील शाळा मु.पो.केज (शिक्षक कॉलनी), ता.केज, जि.बीड येथे स्थलांतर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे .

२. सदर संस्थेच्या मान्यतेचे वर्ष २००२ आणि शाळेची मान्य विद्यार्थी संख्या २५ निवासी अनुदानीत व २५ निवासी विनाअनुदानीत अशी एकूण ५० विद्यार्थी संख्या राहील.

३. सदर संस्थेला अपंग/विशेष शाळा मान्यता व अनुदान या योजनेचे अस्तित्वात असलेले नियम व वेळोवेळी अस्तित्वात येणारे नियम बंधनकारक राहतील.

४. सदर अपंग निवासी शाळेचे स्थलांतरणाचा सर्व खर्च संबंधीत संस्थेला करावा लागेल. त्याची प्रतिपूर्ती देय असणार नाही.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१९१००३१६०५५४२१२२ असा आहे .हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINGLE DINESH RAMCHANDRA

Digitally signed by DINGLE DINESH RAMCHANDRA
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=8612f2011cf8cde3b074d561cd711c17c6c3fd836467a8648a8d21dc84bc01be, postalCode=400032, street=151 ANNEX,1ST FLOOR,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=fc344849650ce07c3f9adc7e2cd4976b2852065e2acd65f7cee1828c10091458, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL JUSTICE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=DINGLE DINESH RAMCHANDRA
Date: 2019.10.03 16:07:02 +05'30'

**( दि. रा. डिंगळे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई ४०००३२.
२) प्रधान सचिव (सामाजिक न्याय) यांचे स्वीय सहायक, मुंबई ४०००३२.
३) आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, औरंगाबाद.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बीड .
६) समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, बीड.
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
८) जिल्हा कोषाधिकारी, बीड.
९) अध्यक्ष/सचिव, मुंदडाताई सेवाभावी संस्था, बीड संचलीत अस्थिव्यंग निवासी विद्यालय, साळेगांव, ता.केज, जि.बीड.
१०) निवडनस्ती (अपंग कल्याण-१)

*****